**श्री. शशिकांत चालिकवार, उप नियंत्रक (गट-अ), वैधमापन शास्त्र, औरंगाबाद विभाग यांचे स्वेच्छा सेवानिवृत्तीस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन आदेश क्रमांक - वैमाशा-२०२०/प्र.क्र.५७/ग्रासं-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय-विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक - १८ ऑगस्ट, २०२०

<u>वाचा</u> :- १) महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२, नियम क्रमांक ६६ (१)

२) श्री. शशिकांत चालिकवार, उप नियंत्रक (गट-अ), वैधमापन शास्त्र औरंगाबाद विभाग यांचा दि.८ जुन, २०२० रोजीचा अर्ज..

३) नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांचे पत्र क्र. वैमाशा-३ / आस्था उ.नि./श.चा./ स्वे.से.नि. २०२० / ४६४, दिनांक १५ जुन, २०२० रोजीचे पत्र

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.२ येथील दिनांक दिनांक ८ जुन, २०२० च्या अर्जान्वये श्री. शशिकांत चालिकवार, उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र (गट-अ / राजपत्रित) यांनी वैयक्तिक कारणास्तव स्वेच्छा सेवानिवृत्ती घेण्याची ईच्छा व्यक्त करुन ०३ महिने अगोदर पूर्वसूचना (Notice ) दिली आहे.संदर्भ क्र. ३ येथील दिनांक १५ जुन, २०२० च्या पत्रान्वये नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी श्री. शशिकांत चालिकवार, उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांचा स्वेच्छा सेवानिवृत्तीची अर्ज त्यांचे शिफारशीसह पुढील कार्यवाहीस्तव शासनास सादर केलेला आहे. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ६६ (१) मधील तरतुदीनुसार श्री. शशिकांत चालिकवार, उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांची दिनांक ८/६/२०२० रोजीची स्वेच्छा सेवानिवृत्तीची पूर्वसूचना स्वीकारुन त्यांना दिनांक ३०/९/२०२० (म.नं.) पासून शासन सेवेतून कार्यमुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. श्री. शशिकांत चालिकवार, उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांच्याविरुध्द सद्यस्थितीत कोणतीही विभागीय चौकशी / न्यायालयीन / लाचलुचपत / शिस्तभंगाविषयक प्रकरण सुरु अथवा प्रलंबित / प्रस्तावित नाही तसेच त्यांच्याकडून कोणत्याही प्रकारचे शासकीय येणे शिल्लक नाही.

०३. नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी श्री. चालिकवार यांचे निवृत्तीवेतन व इतर अनुषंगीक बाबींबाबत आवश्यक ते कार्यकारी आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

०४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८१८१२५४५०२१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHESHRAO BHASKAR KUTE

Digitally signed by SHESHRAO BHASKAR KUTE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=b83dd3164bf1a6f2c48a39007e78789c79c52e07ad200c3250d381947c40582e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=b9e0c912bdfbc8224f1554ba0bc93342824e4faa118ed64c79ac40826e1611b3, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHESHRAO BHASKAR KUTE
Date: 2020.08.18 13:05:33 +05'30'

**( शे. भा. कुटे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) श्री. शशिकांत चालिकवार, उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, औरंगाबाद
(नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांचे मार्फत)

**प्रत,**

१) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व उप नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई / औरंगाबाद
६) महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई / औरंगाबाद
७) अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे-पूर्व, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
९) निवडनस्ती (ग्रासं-३).